नवनाथ भक्तिसार अध्याय सदतिसावा

महागुरू मच्छिंद्रनाथांच्या आदेशानुसार उग्र तपश्चर्या पूर्ण झाल्यावर तीर्थयात्रा करीत भ्रमंती करीत रेवणनाथ माण देशातील ‘वीट’ या गावी मुक्कामास गेले. भिक्षा मागण्यासाठी ‘सरस्वती’ नामक एका ब्राम्हणाच्या घरासमोर उभे राहिले. ‘अल्लख निरंजन!’ असा पुकारा करताच यजमान सरस्वती वाड्याबाहेर आला, घरात बारसे साजरे होत असताना दारात तेजःपुंज व्यक्तिमत्वाचा साधूपुरुष अतिथी म्हणून आला आहे, याचा त्याला खूप आनंद झाला. या पूर्वी या ब्राम्हणाची सहा मुले जन्मानंतर सहासात दिवसांच्या कालावधीत मृत झाली होती. हा सातवा पुत्र आज बाराव्या दिवसापर्यंत जिवंत आहे, आता हा पुत्र जगणार अशी आशा निर्माण झाल्याने, आनंदात त्याचे बरसे साजरे होत होते. ब्राम्हणाने शुभयोग मानून रेवणनाथांना श्रद्धेने घरी आणले, त्यांची यथोचित पूजाअर्चा केली. स्वहस्ते भोजनासाठी पक्वान्ने वाढली. नंतर त्यांना आजचा दिवस राहण्याचा आग्रह केला. पण मध्यरात्री दुर्दैवाने ब्राम्हणाचा सातवा पुत्रही मृत झाला. सकाळी जाग येताच नाथांना, ब्राम्हण पत्नीचे रुदन ऐकू आले. ही दुःखद घटना नाथांना व्यथितच नाही तर संतप्त करून गेली. ते उघडपणे म्हणाले, “मी इथे उपस्थित असतांना यमराजाचे साहस झालेच कसे?” ते ब्राम्हणाला म्हणाले, “या बालकाचा मृत देह तीन दिवस असाच राहू दे, मी त्याचे आणि तुझ्या सहाही मुलांचे प्राण परत घेऊन येतो.” रेवणनाथ व्यानास्त्राने तडक यमाकडे गेले. त्यांना पाहून यमाची अवस्था बिकट झाली कारण नाथांपुढे कुणाचेही सामर्थ्य कुचकामी पडते. त्यांनी नाथांची कशीबशी समजूत काढली, “मी इथला चाकर असून ब्रम्हा, विष्णू, महेश हे कर्ते करविते आहेत. ब्रम्हा उत्पत्ती करतो, विष्णू पालन पोषण करतो आणि श्रीशिव लय करतात. सबब शंकरांकडे जाऊन गोडीगुलाबीने काम फत्ते करावे. पण शिवगणांच्या उद्दामपणामुळे तिथे बांका प्रसंग निर्माण झाला, रणकंदनात श्रीशिवाच्या लाजीरवाणा पराभव झाला. गंधर्वांनी हे श्रीविष्णूंना कळविले आणि श्रीविष्णूने मध्यस्थी करून सरस्वती ब्राम्हणाच्या सातही बालकांचे आत्मे रेवणनाथांना परत दिले. याच अध्यायात पुढे अविहोत्र नारायणाने वटसिद्ध नागनाथाच्या अवतारात भूलोकी येणे केले आहे. त्याचे रम्य कथानक ग्रंथकर्त्या कवींनी अनेक लहान सहान तपशीलांसह अत्यंत रंजकतेने सादर केले आहे. पद्मिनी नामक सर्पिणीच्या उदरांतून वटवृक्षाच्या ढोलीत जन्म, कोशधर्मा आणि सुरादेवी या ब्राम्हण दांपत्याने त्याचे पालनपोषण केले. बालवयातच श्रीदत्तांनी त्याला सिद्धी बहाल केली. त्या सिद्धीच्या माध्यमांतून वटसिद्ध नागनाथांनी अगणित लोकांच्या आशा आकांक्षांची पूर्तता केली. अनेकांच्या विपत्ती दूर केल्या, त्यामुळे त्यांनाही दिगंत किर्ती मिळाली. पण वटसिद्ध नागनाथ त्यांत सुखी नव्हते, त्यांना श्रीदत्तगुरूंच्या दर्शनाची ओढ लागली होती. त्यासाठी ते तीर्थाटन करीत कोलापुरात गेले. श्रीदत्तगुरूंचे दर्शन प्राप्त करण्या हेतू त्यांनी एक अभूतपूर्व प्रयोग करायचे योजिले, त्यांना श्रीदत्तगुरूंचे दर्शन मिळणार की नाही त्यासाठी ही पुढील कथा...

कोलापुरातील महालक्ष्मी मंदिराची ओसरी सुवर्ण राशींनी भरली आहे. हे पाहून पुजारी थक्कच झाला. त्या राशींकडे उंगली निर्देश करीत नागनाथ म्हणाले, “जोपर्यंत या सुवर्णराशी खर्ची पडत नाहीत तोपर्यंत अखंड अन्नछत्र घालावे. कसलाही जातीभेद न करता, सर्व जात, पंथ, धर्म, वर्णाच्या लोकांना पंगतीला वाढावे. शेठ, सावकार, राजा, राव, रंक, श्रीमंत, गरीब सर्वांना तिन्ही त्रिकाल, मुक्त हस्ते अन्नदानाने संतुष्ट करावे. आपल्या घरात अन्न शिजवण्याचा प्रसंग कोणावर येऊ नये.” त्या पुजाऱ्याने फक्त होकारासाठी मान हलविली. कारण हे सर्व पाहून त्याची वाचाच बंद झाली होती. पुजारी सुद्धा तत्परतेने कामाला लागला. महालक्ष्मी मंदिरासमोरच्या प्रांगणात भव्य मंडप उभारण्यात आला. दुसऱ्या बाजूस अन्नपदार्थ निर्माण करण्यासाठी भट्ट्या धडाडून पेटल्या. असंख्य आचार्यांचे हात कार्यमग्न झाले.

कोल्हापुरी पद्धतीचे मराठी, ब्राम्हणी, जैन गुजराथी, मारवाडी, द्राविडी, मुलतानी, बंगाली मिठाई अशा भिन्न भिन्न जातीजमातीच्या लोकांच्या आवडी निवडी लक्षांत घेऊन सुग्रास अन्न आणि इतर पक्वान्नांची निर्मिती सुरु झाली. रुचकर आणि लज्जतदार अन्नपदार्थांच्या राशी उभ्या राहिल्या. गावात आणि जवळ पासच्या परिसरात दवंडी पिटवून सर्वांना दररोज चूल बंद ठेवण्याचे आव्हान करण्यात आले. घराघरात निमंत्रणाद्वारे आग्रहाने येण्यासाठी सांगावा धाडण्यात आला. त्याप्रमाणे लोकांच्या झुंडीच्या झुंडी हजर झाल्याने मंडप भरून गेले. पंगतीवर पंगत उठू लागल्या, अखंडपणे न थांबणारी कार्यगती सुरु झाली. लोक खाऊन जात होते आणि भूक लागल्यावर पुन्हा खायला येत होते. काही जण तर घरीही घेऊन जात होते. लोकांनी तर अन्न आणि कोरड्या शिध्याने घरे भरून ठेवली. कुणालाही कसले बंधन नाही की कशाची कमतरता नाही. अशी आबादीआबाद वातावरणात निर्माण झाले. सर्व गाव सिद्धी अन्नाने भरून गेले होते. लोक चुली पेटवून स्वयंपाक करायचे विसरुन गेले.

श्रीगुरु दत्तात्रेयांच्या दर्शनासाठी व्याकूळ नाथ मात्र अस्वस्थ आहेत. प्रतिक्षेत आहेत. अन्नछत्राच्या पहिल्या दिवशी ओंगळवाण्या कुरूप भिकाऱ्याच्या रुपात श्रीदत्त घरोघरी भिक्षा मागत फिरत होते. तेव्हा लोकच त्यांना म्हणाले, “अरे भिक्षुका! गावात लक्ष्मी मंदिरासमोरील मुक्त अन्नछत्रात जाऊन पक्वान्ने खायची सोडून, दारोदार शिळे तुकडे मागत कशाला फिरतो आहेस? कामधेनुच्या कासेतले धारोष्ण दुध प्राशन करायचे सोडून कोंड्याच्या भाकरीची कशाला अपेक्षा करीत आहेस? कल्पतरूच्या सावलीत हवे ते मिळत असतांना अन्नाच्या घासासाठी वणवण कशाला फिरतो आहेस? जवळ परीस असताना सोने मिळवण्यासाठी व्यर्थ कष्ट कशासाठी करतो आहेस? नशिबाने अमृतकुंभ समोर ठेवला असतानाही तू झाडपालाचा रस का चाखतो आहेस? या संपूर्ण गावात भिक्षा मागणारा तू एकच मतीमंद आहेस. जा बाबा जा! अन्नछत्रात जाऊन पोटभर खा. आम्ही सुद्धा सर्वजण, सहकुटुंब तिकडेच निघालो आहोत. सगळे गावच तिकडे लोटले आहे. तू देखील जा.” श्रीदत्त पुढच्या घरी गेले. तिथेही असेच ऐकायला मिळाले. घरोघरी भिक्षे ऐवजी हेच उत्तर मिळाले. श्रीदत्तगुरु मनात म्हणाले, “हा काय प्रकार आहे, तो स्वतःच्या नजरेनेच पहिले पाहिजे.” भिकारी वेषातील दत्तगुरूंनी पाकशाळे जवळ जाऊन योग दृष्टीने पहिले असतां, ते सिद्धी अन्न असल्याचे त्यांनी क्षणात जाणले. थोडे केले तरी ढीग लागत होता. कितीही खाल्ले तरी संपत नव्हते. त्यांनी तेथील काही तृप्त खवय्यांना विचारले, “एवढे मोठे अन्नछत्र कोणी घातले आहे हो?” लोक म्हणाले, “महासमर्थ वटसिद्ध नागनाथ महाराजांची कृपा आहे.” ते ऐकून त्यांना काशी क्षेत्राचा प्रसंग आठवून ओळख पटली. “एका बालकाला आपण सिद्धी दिली होती, त्याला वीस वर्षे होऊन गेली. आता तो तरूण झाला असेल. माझ्या भेटीची इच्छा घेऊन तो इथे आला आहे. मला भिक्षा न मिळून मी प्रकट व्हावे किंवा मला ओळखणे सोपे जावे म्हणून त्याचा हा खटाटोप असावा. ठीक आहे! सर्व अन्न सिद्धी अन्नाने भरले असल्याने आजचा दिवस आपण उपवास करू या.” असा विचार करून ते निघाले, लोकांनी पळत जाऊन त्यांना अडविले. हातला धरून म्हणाले, “काय राव! उपाशी निघाला काय? अन्नाचा असा अपमान करू नका. बसा जेवायला.” त्यावेळी उपवास व्रत वगैरे असल्याचे सांगून गुरुदेव दत्तांनी सुटका करून घेतली आणि कोरडे धान्य मागून काशीक्षेत्री शिजवून भोजन केले.

असे अन्नछत्र सुरु होऊन एक महिना उलटला. गुरुदत्तांना रोजचा उपवास घडत आहे, नागनाथ विचार करीत आहेत, “आज एक महिना झालाय! अद्यापपर्यंत गुरूदेवांचा शोध लागला नाही. काय युक्ती करावी? क्षणभर विचार करून ग्रामस्थांना विचारले, “सज्जन हो! गावात कुणी भिक्षा मागत फिरतो आहे काय? एक सज्जन गावकरी म्हणाला, “एक

भिकारी भिक्षा मागतांना अनेकदा दिसतो. तो येथे अन्न न खाता घरोघरीच भिक्षा मागत असतो. आता गावातील सर्वच लोक इथे जेवत असल्याने त्याला भिक्षा सुद्धा मिळेनाशी झाली आहे." "तो भिक्षुक गावात आल्याक्षणी मला कळवा. त्याला मात्र कांही बोलू नका, किंवा सांगूही नका. मी त्याची विनवणी करून त्याला भोजन खाऊ घालीन. त्या भिक्षुकाने कोरडे धान्य मागितल्यास हे धान्य वाढा, त्याने त्याचा स्वीकार केला नाही तर मला सत्वर कळवा." अशा सूचना नागनाथांनी गावकऱ्यांना दिल्या. गावकऱ्यांनीही त्या निष्ठेने पाळायचे ठरविले कारण 'ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी ताली' या न्यायाने सर्व गावकऱ्यांनी होकार दिला.

नित्यनियमांप्रमाणे वेषांतरीत दत्त भिक्षा मागत फिरू लागले. लोक सिद्धीनिर्मित धान्य देऊ लागताच ते चमकून मागे सरकले, भिक्षा घेतली नाही. लोकांनी चतुराईने ही गोष्ट नागनाथांना कळवली. तोच नाथ धावत तिथे आले. लोकांनी बोट दाखविले तिथे धावले आणि त्या भिक्षुकाचे पाय धरले, हात जोडून म्हणाले, "दयाळू गुरु माऊली! मला पाडसाला सोडून का जाता? काशीमध्ये भेटून मला सिद्धी दिलीत; त्या दिवसांपासून आजपर्यंत मला टाकून गेला होतात! मी घोर अरण्यात एकटा पडलो आहे. मार्ग सापडत नाही. चातकाने मेघाची प्रतिक्षा करावी, किंवा पाडसाने हरिणीच्या वाटेकडे डोळे लावून बसावे, त्याप्रमाणे तुमच्या दर्शनाचे शीतल जल प्राप्त न झाल्याने मी पाण्यावाचून मासोळीसारखा तडफडत आहे. गुरुमाऊली! आपण तर कमळ पाकळ्यांसारख्या कोमळ हृदयांचे असतांना इतके कठोर कसे झालात? मला एकट्याला टाकून नका हो जाऊ!" असे म्हणून लहान मुलासारखे स्फुंदत रडू लागले. टप् टप् टप् आश्रुंचा अभिषेक दत्तगुरूंच्या चरणांवर होऊ लागला. देह कंप पावू लागला. त्याचा पश्चाताप आणि दग्ध शोकावेग, गुरुदर्शनाची आसक्ती पाहून कोमल मनाच्या श्रीदत्तांनी त्याला उठवून मिठीत घेतले, त्याचे आश्रू स्वहस्ते पुसले आणि त्याचा हात धरून एकांतात घेऊन गेले. माथ्यावर कृपाहस्त ठेवून कानात मंत्र सांगितला. अज्ञानत्वांची जळमटे झटकून दूर केली आणि त्याला ब्रम्हपरायण केले. काळ्याकुट्ट मेघांचा पटल दूर होऊन ज्ञानदृष्टीचा स्वच्छ सूर्यप्रकाश पडला. तेव्हा श्रीदत्तात्रेयांचे खरे ज्ञानस्वरूप पाहून नागनाथ आनंदाने प्रफुल्लीत झाले. "गुरुस्वामी! गुरुस्वामी!!" म्हणत पुन्हा पुन्हा पाया पडू लागले. मायेने जवळ घेत ते त्याला म्हणाले, "मुला! तू काशी विश्वेश्वरा नजीक भेटलास तेव्हाच मी तुला ओळखले होते. म्हणूनच तुझ्या हातात सिद्धी सोपवली होती. तुझ्या भेटीसाठी माझे मनसुद्धा आतुर झाले होते. तो योग आज आला. लोहकण चुंबकाकडे आकर्षिला जावा तशी आपली भेट झाली होती पण आज मात्र मिठाचा डोंगर सागरात विरघळला तसे आपण एकजीव झालो आहोत. ही दैवी लीला आहे." गुरुदर्शनासाठी केलेली भटकंती आणि सायास प्रयास कारणी लागले हे समाधान नागनाथांच्या चर्येवर विलसत होते.

त्यानंतर त्यांनी कोल्हापूर सोडले. यानमंत्र प्रयोगाने त्वरेने काशी क्षेत्री गेले. नित्यनियमात व्यत्यय येऊ नये म्हणून काही क्षण तेथे थांबून बद्रीकेदाराकडे निघाले. शिवालयात जाऊन श्रीबद्रीकेदारेश्वाराचे दर्शन घेतले. श्रीशिवाने प्रकट होऊन श्रीदत्तात्रेयांची गळाभेट घेतली आणि त्यांच्यासह आलेल्या नवागत सेवाकांविषयी विचारणा केली. श्रीदत्त म्हणाले, "सदाशिवा, हा अविहोत्र नारायण 'नागनाथ' नावाने अवतरला आहे. हा नवनाथांमधील एक किर्तिवंत नाथ होईल!" श्रीशिवांनी दत्तात्रेयांना सुचविले की त्याला याच ठिकाणी विद्यापारंगत करून नंतर नाथपंथात समाविष्ट करावा. श्रीगुरु दत्तांनीसुद्धा त्यांची आज्ञा प्रमाण मानली आणि सहा महिने तिथे राहिले. नागनाथला चौदा विद्या, चौसष्ट कला शिकविल्या. मार्तंड पर्वतावरील नाग अश्वत्थ वृक्ष सिंचन करून दैवते प्रसन्न करून घेतली. पुन्हा बद्रिकाश्रमात येऊन नाथपंथी दीक्षा दिली आणि बारा वर्षांच्या खडतर तपाला बसविले. तपाच्या सांगता सोहळ्यासाठी स्वर्गीय देवदेवतांना

आमंत्रित करून वर प्राप्ती करवून घेतली आणि नागनाथांना म्हणाले, “नागनाथा! आता तीर्थयात्रेला जा. तीर्थस्थानांवर सज्जनांच्या सहवासाने मनाचा मळ धुतला जाऊन शुद्धता येते.” त्यांना वंदन करून नागनाथ तीर्थाटनास गेले. श्रीदत्त गिरनार आश्रमात गेले.

नागनाथांनी श्रीगुरु दत्तात्रेयांची आज्ञा प्रमाण मानून भ्रमंती सुरु केली. भूतलावरील अनेक तीर्थ स्थानांना श्रद्धापूर्वक भेट देऊन ते बालेघाटात गेले. तेथील निसर्गसमृद्ध घनदाट आरण्य त्यांच्या मनास भावले. त्यांनी तेथेच वस्ती केली. अल्प काळातच त्यांच्या तेजस्वी, दैवी व्यक्तिमत्वाने, त्यांच्या सदाचरणाने आणि नित्यनेमाने ते करीत असलेल्या जपजाप्य अनुष्ठानाधी, नामस्मरणामुळे तेथील लोक प्रभावीत झाले. गावोगावी त्यांना प्रसिद्धी मिळून अनेक श्रद्धावंत त्यांच्या दर्शनासाठी येऊ लागले. दिवसेंदिवस भक्तांची संख्या वाढत गेली. हळूहळू तिथे वसाहतच निर्माण झाली. निसर्गाच्या कुशीत एक टुमदार गाव वसले गेले. नाथांनी त्याचे ‘वडवळ ग्राम’ असे नामकरण केले. भक्तगणांनी त्यांच्यासाठी बांधलेल्या मठात त्यांचे वास्तव्य असे. योगायोगाने तेथे एके दिवशी मच्छिंद्रनाथ भ्रमंती करीत त्याच स्थानी मुक्कामासाठी आले असतां त्यांच्या कानावर नागनाथांची कीर्ती गेली आणि त्यांच्या भेटीसाठी ते मठाकडे गेले. मठाच्या दारातून आत शिरता शिरता शिष्यगणांनी त्यांना अडविले. “अहो, नाथबुवा! सरळ सरळ मठात घुसखोरी करू लागलात? प्रथम श्रीनागनाथांची परवानगी मिळविली पाहिजे. त्यांनी तशी आज्ञा दिली तरच तुम्हाला आत सोडण्यात येईल. परवानगीशिवाय आत जाता येणार नाही. चला मागे फिरून बाहेर उभे रहा!” हे ऐकून मच्छिंद्रनाथ अतिशय क्रुद्ध झाले. मनात म्हणाले, “हा फारच मुजोर संत दिसतोय, दांभिकही असावा. संन्याशाला कशाला पाहिजे मिजास? देवाचे दार आणि साधूसंन्याशांचे दार सर्वांसाठी निरंतर मुक्त असावे. जेथे जेथे बंधनं, गोपनीयता आणि बडेजाव आहे, अशा ठिकाणी फसवाफसवीची प्रक्रिया चालू असते. अशा भोंदूला चांगलीच शिक्षा करून सरळ मार्गावर आणले पाहिजे.” अशा विचारांनी कोपित होऊन त्यांनी शिष्यांना चांगलेच ठोकून काढले. तेव्हा एकदम सातशे शिष्य त्यांच्यावर चाल करून आले. मच्छिंद्रनाथांनी स्पर्शास्त्र सोडून त्या सर्वांना जागच्या जागी चिकटवून टाकले आणि एकेकाचे थोबाड सडकवायला सुरवात केली. त्यांच्या आरडाओरडीने आणि किंकाळ्यांनी नाथांची समाधी भंग पावली. ते कोपायमान झाले. गुहेतून वनराज सिंह बाहेर यावा तसे ते मठाच्या ओसरीवर आले. पाहतात तर सर्वच शिष्य भूमीला चिकटलेल्या अवस्थेत आणि एक साधू त्यांचे तोंड फोडीत आहे. हे पाहून नागनाथ फारच क्रोधीत झाले, मनाशी म्हणाले, “या नाथपंथी साधूची बुद्धी भ्रष्ट झाली आहे काय? दया, क्षमा, शांती ही साधूची लक्षणे आहेत. स्वप्नात सुद्धा उग्र वागू नये पण याने तर नाथपंथाला काळीमाच फसला आहे. कोणत्या राक्षसबुद्धी गुरूने याला उपदेश केला, कोण जाणे? असल्या कलंकीताला शिक्षा करून याची नाथदीक्षा हिरवूनच घेतली पाहिजे.” संतापाच्या आवेगात त्यांनी धुनीभस्म घेतले, गरुड बंधन मंत्राने स्वर्गात गरुडाला बांधून ठेवले. विभक्तास्त्र सोडून शिष्यांना मुक्त केले. ते थरथर कपात त्यांच्या मागे जाऊन लपले. ते पाहून मच्छिंद्रानाथांनी पर्वतास्त्र सोडताच, महाकाय पर्वत त्यांच्यावर कोसळण्यासाठी आला. नागनाथांनी त्यावर इंद्र वज्रास्त्र सोडले. त्यायोगे आकाशात इंद्रदेव प्रकट होऊन, त्यांनी वज्र टाकून पर्वताचे चूर्ण केले. इंद्राची ही लुडबुड पाहून मच्छिंद्र त्यांच्यावर कोपले, वाताकर्षण मंत्राने त्याला मूर्च्छित करून ते भूमीवर धडकन आदळले. चवताळलेल्या नागनाथांनी वातप्रेरक अस्त्र सोडून इंद्राला सावध केले. यांच्या युद्धात मरता मरता वाचलेला इंद्र घाबरून पळून गेला. रागाने लाल झालेल्या मच्छिंद्रांनी महापराक्रमी वसवशक्ती प्रकट करून नागनाथांवर सोडली. हजारो सूर्यांच्या तेजासारखा लखलखाट झाला आणि कानठळ्या बसविणारा कडकडाट करीत वासवशक्ती धावून आली. धरणी थरथरली,

पर्वत कडे ढासळून पडू लागले, भयाने सर्व सजीव लपून बसले. एकच हाहाकार उडाला. नागनाथांनी धीरोदात्तपणे बंधनविद्याने सर्व देवतांचे बंधन केले. मग हेमाद्री पर्वत अस्त्राने वासवास्त्राचे निवारण केले. ते पाहून बिथरलेल्या मच्छिंद्रनाथांनी वज्रास्त्राचा जप केला असतां तो निष्फळ ठरला. मग इतर नाना अस्त्रांचे स्मरण केले. पण मात्रा चालेना. कारण नागनाथांच्या बंधानास्त्राने सर्वच दैवते बद्धावस्थेत असल्याने मच्छिंद्राची अस्त्रेच चालेनाशी झाली. त्रस्त आणि हतबल होऊन ते हताशपणे स्तब्ध उभेच राहिले. नागनाथांनी सर्पास्त्र सोडल्यामुळे अगणित विषारी सर्प फुत्कार सोडीत मच्छिंद्रनाथांवर चाल करून आले. त्यांनी प्रतिकारासाठी गरुडास्त्राचा जप केला. परंतु व्यर्थ ठरला. जहाल विषारी सर्पांनी मच्छिंद्रावर डंख मारले. सर्वांगात विष भिनल्यामुळे मच्छिंद्र खाली कोसळले. तोंडातून फेस येऊ लागला. नेत्रांसमोर अंधारी येऊ लागली. असहाय्य वेदनांमुळे मूर्च्छा येऊ लागली. डोळे जड होऊन पापण्या मिटू लागल्या. आपण आता वाचत नाही असे वाटून त्यांनी सद्गुरूंचा धावा सुरु केला.

“ॐ चैतन्य दत्तात्रेयाय नमः!! श्री दत्तगुरूमाऊली धाव s s! हे अत्रिसुता धाव s s, हे त्रिदेव अवतार मूर्ती धावा!! मी तुमचा बालक सर्पविषांनी व्याकूळ झालो आहे. काळरूपी व्याघ्राने माझा कंठ फोडला आहे. परम संकटात सापडलो आहे. तुमच्याशिवाय कोण मला वाचवील? हे सर्वसाक्षी दत्ता!! तुला कशी काळझोप लागलीय? जय जय गुरदेव दत्त, हे दत्त... हे दत्तात्रेय!” त्यांचा दत्त धावा ऐकून नागनाथ मनाशी म्हणतात, “हा तर माझ्या गुरूंचा धावा करीत आहे. हा काय प्रकार आहे?” मग मच्छिंद्राजवळ जाऊन विचारले, “महाराज, आपल्या गुरूंचे नाव काय आहे?” मच्छिंद्र प्रयासाने उत्तरले, “श्रीदत्त!, श्री दत्तांचा शिष्य मच्छिंद्र असून नाथपंथीयांमधला आद्य नाथ आहे. माझ्यानंतर जालिंदरनाथ, भर्तरीनाथ, रेवणनाथ यांना दत्तदुरुंचे शिष्य होण्याचे भाग्य लाभले आहे. माझा अंतःकाळ आता जवळ आला आहे. हे दत्त! हे श्रीगुरु दत्त!!” हे सारे ऐकून नागनाथांच्या घशाला कोरड पडली, अंतःकरणाला अतिशय क्लेश झाले. त्यांनी त्वरेने गरुडाला बंधनातून मुक्त केले आणि गरुडास्त्र जपताच, पंख पसरून झेप घेत गरुड आकाशात प्रकट झाला. त्याच्या भरारीची चाहूल लागताक्षणी सर्व सर्पांनी तत्काळ विष शोषून सैरावैरा पळ काढत अदृश्य झाले. पल्लेदार झेप घेऊन गरुड उभय नाथांजवळ उतरला. उभयतांना नमस्कार करून भरारी घेत स्वर्गात निघून गेला. पश्चातापदग्ध नागनाथांनी मच्छिंद्राच्या चरणांवर मस्तक ठेवले आणि हात जोडून म्हणाला, “क्षमा करा महाराज! मजकडून घोर अपराध घडला. तुम्ही माझे वडीलबंधू आहात. ज्येष्ठ बंधू पित्यासमान असतो. तुम्ही मला गुरदेवदत्तांएवढेच वंदनीय आहात. अज्ञानातून अपराध घडला आहे, क्षमा करा.” मग त्यांना मठात नेऊन त्यांची सेवा केली. त्यांना आग्रहपूर्वक एक महिना ठेवून घेतले.

ज्या कारणामुळे या उभयतांमध्ये संघर्ष उद्भवला, त्याची जिज्ञासा मच्छिंद्रनाथांना त्रस्त करीत असावी. एके दिवशी वडिलकीच्या भावनेतून त्यांनी विचारले, “नागनाथा! अती दूर अंतरावरून पायपीट करीत भाविक तुझ्या दर्शनासाठी येतात परंतु द्वाररक्षक त्यांना आत का येऊ देत नाहीत? आपल्या मधला संघर्ष ही याच कारणावरून घडला. तरी तू दरवाजावर बंधन का ठेवले आहेस? नागनाथ म्हणाले, “ज्येष्ठ बंधूराजा! मी नेहमी ध्यानस्थ असतो, अगणित लोक येऊन माझे ध्यान भंग करतात, केवळ ते टाळण्यासाठी मी हे बंधन ठेवले आहे.” तेव्हा मच्छिंद्र त्यांना म्हणाले, “नागनाथा! हे चांगले नाही, नाथपंथीयासाठी हे भूषणावह नाही. गोर गरीब जनता, हीन दीन, पिडीत लोक तुझ्या चरणी सुख मागण्यासाठी, पवित्र, पावन होण्यासाठी येतात, यास्तव तू दार बंद करणे योग्य नाही. अरे! तुझ्या दारातून ते रिक्त हस्तांनी परतत आहेत. जगताचे दुःख दूर करण्यासाठी आपले अवतार आहेत. तरी यापुढे सर्वांसाठी मुक्तद्वार

ठेवून लोकांच्या दुःख वेदना नष्ट करून कीर्ती मिळवावी." त्यानंतर मात्र नागनाथांनी पुन्हा असे कधीच होणार नाही, याची शाश्वती दिली. तेव्हापासून वटसिद्ध नागनाथांनी मठाचे द्वार सर्वांसाठी खुले ठेवले.

काही दिवसानंतर मच्छिंद्रनाथ तेथून तीर्थयात्रेसाठी निघून गेले. असंख्य लोक नागनाथांच्या आश्रमात येऊन दुःखमुक्त होऊन जाऊ लागले. एकदा चांगुणा नामक शिष्याची स्त्री मठात मृत्यु पावली, तेव्हा नाथांनी तिला पुन्हा जिवंत केले. या घटनेचा बोभाटा होऊन प्रसार झाला. मग कुणाघरी मृत्यु झाल्यास लोक मठात येऊ लागले आणि नाथ त्यांना उठवू लागले. अनेकदा असे घडल्याने धर्मराज यमराज संकटात पडले. मग त्यांनी सत्यलोकात जाऊन ब्रम्हदेवाला स्वकार्यात विघ्न कसे येते त्याचे कथन केले. तेव्हा प्रत्यक्ष ब्रम्हदेव नाथांसमोर प्रकटले आणि या कृती मागील अनिष्ट परिणामांचे गांभीर्य नाथांना पटवून दिले. तेव्हापासून हा प्रकार बंद झाला.

नागनाथांनी नऊ सिद्ध निर्माण केले. चांगुलसिद्ध, धर्मसिद्ध, देवसिद्ध, भोमासिद्ध, भोमनासिद्ध, देवनासिद्ध, कोकीळसिद्ध, सुंदरसिद्ध आणि चक्षुसिद्ध ही त्यांची नावे आहेत. पुढे त्यांचा चौऱ्याऐंशी सिद्धांत समावेश झाला. त्यांनीही साबरी कवित्व केले. नागनाथांनी एक कोटी एक लक्ष साबरी काव्यरचना केल्या. धांव रे, खांडुक, उसण, टिके, किरळ. अहिर नैम इत्यादी अनेक रोगांवर, दुःखपरिहारक, तसेच सर्प, वृश्चिक वगैरे दंशहारक काव्यरचना त्यांच्याकडून झाली. त्याची आजही प्रचिती येते. पुढे नाथांनी बहिरंभट, रामजी, हेमकारक सोनार आदी भक्तांचा उद्धार केला.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने शील तेजस्वी राहते, अज्ञान नष्ट होते.